**मौजे केवनाळे व मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड या गावांच्या कायमस्वरुपी पुनर्वसनाकरीता निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक: दग्रपु ३१२३/४१/प्र.क्र.३२/र-५,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ जुलै, २०२३.

संदर्भ:-१) शासन निर्णय क्र.पुनर्व २०२१/प्र.क्र.३४/भाग-२/आव्यप्र-२, दि.०८.०२.२०२२
२) शासन निर्णय क्र.पुनर्व २०२१/प्र.क्र.३४/भाग-२/आव्यप्र-२, दि.०२.०५.२०२२

**प्रस्तावना:**

मौजे केवनाळे व मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड येथे दिनांक २१ व २२ जुलै, २०२१ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे दरड कोसळून मोठ्या प्रमाणात जिवित व वित्त हानी झालेली आहे. सदर गावांतील दरड कोसळून बाधित झालेल्या नागरीकांचे कायमस्वरुपी पुनर्वसन करण्याच्या उद्देशाने भूसंपादन व नागरी सुविधांसाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये यापुर्वी निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर गावातील नागरीकांचे घर बांधकाम करुन कायमस्वरुपी पुनर्वसन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मौजे केवनाळे व मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड येथे दिनांक २१ व २२ जुलै, २०२१ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे दरड कोसळून मोठ्या प्रमाणात जिवित व वित्त हानी झालेल्या नागरिकांचे कायमस्वरुपी पुनर्वसनाच्या प्रस्तावास शासनाने मान्यता दिली असल्याने जिल्हाधिकारी, रायगड यांनी प्रस्तावित केल्यानुसार घर बांधकाम करणे या कामांकरीता एकूण रु. ३,९५,६०,०००/-(रु. तीन कोटी पंचान्नव लाख साठ हजार फक्त) इतका निधी या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

**तक्ता**

| अ.क्र. | गावाचे नाव | घरांची संख्या | प्रति कुटूंब देय रक्कम | एकुण आवश्यक निधी (**रुपये)** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५ (रकाना ३X४)** |
| १. | केवनाळे | १२८ | २,३०,०००/- | २,९४,४०,०००/- |
| २. | साखर(सुतारवाडी) | ४४ | २,३०,०००/- | १,०१,२०,०००/- |
| | **एकूण** | **१७२** | | **३,९५,६०,०००/-** |

२. वरील सर्व कामांसाठी जिल्हाधिकारी, रायगड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या सुधारीत दराने पुर्णत: नष्ट झालेल्या घरासाठी प्रत्येकी रु. १,२०,०००/- इतकी रक्कम अनुज्ञेय असल्याने रक्कम रु. २,०६,४०,०००/-इतका खर्च “मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२- पूर, चक्रीवादळे इत्यादी ११३, घरदुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार खर्च, (९१)(०१) घरांची दुरूस्ती/पुनर्बाधणी यासाठी सहाय्य (अनिवार्य) (योजनेत्तर) (२२४५ ०२७१) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. उर्वरित रककम रु. १,८९,२०,०००/- इतका खर्च

"मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी ११३, घरदुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च, (९२)(०१) घरांची दुरूस्ती/पुनर्बाधणी यासाठी सहाय्य (अनिवार्य) (योजनेत्तर) (२२४५ २३२७) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची जिल्हाधिकारी, रायगड यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्यावत ठेवण्यात यावेत. त्याचप्रमाणे प्रतिमाह होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र पुढील महिन्याच्या २० तारखेपर्यंत जिल्हाधिकारी, रायगड यांनी एकत्रितपणे महसूल व वन विभागास (कार्यासन म-११) न चुकता सादर करावे. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची
पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

५. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणा-या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत, तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक एफएलडी-२०१९/प्र.क्र.१२९/र-१२, दिनांक १४.१०.२०२२ अन्वये दिलेल्या सुचनांना अनुलक्षुन सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२५१२०६५३४३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2023.07.25 12:08:26 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती निवारण प्राधिकरण रायगड.

३. उप विभागीय अधिकारी, महाड/पोलादपूर, जिल्हा रायगड.

४. कोषागार अधिकारी, रायगड.

५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)

६. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, (ब-१/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. निवड नस्ती, र-५.